**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : गौखनि -३५/०२१६/प्र.क्र.७८/ख

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २३/०१/२०१९

**विषय : गौण खनिज-सातारा**

मौजे तासवडे, ता. कराड येथील वाळू भूखंड क्र.१ या वाळूगटातून मंजूर वाळूचे उत्खनन न करता आल्याने प्रमाणशीर रक्कम तसेच अनामत रक्कम परत करणेबाबत.

श्री. संजय आनंदराव जाधव

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी सातारा यांना त्यांचे पत्र क्र. गौख/कावि/१४४४/१५ दि. ९.७.२०१५ च्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१४-१५ करिता मौजे तासवडे, ता. कराड येथील भूखंड क्र. १ मधील १७३८५ ब्रासचा लिलाव श्री. संजय आनंदराव जाधव यांनी रु. ३,०५,००,०००/- एवढया रकमेस घेतला होता. श्री. जाधव यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम शासनजमा केली होती.

सदर भूखंडाचा कब्जा लिलावधारक यांना दिनांक २०/०२/२०१५ रोजी देण्यात आला होता. ग्रामपंचायत कोणेगाव यांनी दिनांक २३/०४/२०१५ रोजी मा. राज्यमंत्री (महसूल) व जिल्हाधिकारी यांचेकडे तक्रार अर्ज करून, राष्ट्रीय पेयजल योजनेतून नळ पाणी पुरवठा योजना विहिरीपासून ५०० मी. पर्यंतचा वाळू उपसा तातडीने बंद करावा अन्यथा उपोषणाला बसणार असल्याचा इशारा दिला होता. तसेच नदीच्या ३० मी. पात्रात मौज तासवडे ग्रामपंचायतीचा हक्क असताना मौजे कोणेगावच्या मळ्या मधील शेतजमीन ढासळून वाळू उपसा करत असलेबाबत कळविण्यात आले होते.

त्याअनुषंगाने तहसिलदार कराड यांनी चौकशी करून अहवाल सादर केल्यानंतर लिलावधारक यांना नोटिस देऊन लिलावधारकाकडून खुलासा मागविण्यात आला. लिलावधारक यांनी दिलेला खुलासा व उप विभागीय अधिकारी कराड यांनी सादर केलेल्या अहवालानुसार जिल्हाधिकारी सातारा यांनी दिनांक २२/५/२०१५ च्या आदेशान्वये लिलावधारकास मंजूर वाळू गट रद्द करुन, लिलावात भरलेली अनामत रक्कम रूपये ५३,८९,३५०/- जप्त केली.

लिलावधारकाने जिल्हाधिकारी यांच्या दिनांक २२/०५/२०१५ रोजीच्या आदेशाविरुध्द अपर आयुक्त पुणे यांच्याकडे फेरतपासणी अर्ज दाखल केला असता, अपर आयुक्त यांनी दिनांक ०५/०७/२०१६ अन्वये सदर पुनर्विलोकन अर्ज फेटाळण्यात येऊन, दिनांक २२/०५/२०१५ चा आदेश कायम केला. लिलावधारकाने उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम परत मिळण्याबाबत शासनाकडे स्वतंत्ररित्या अर्ज केला असता, शासनाने दिनांक ०७/०५/२०१६ च्या आदेशान्वये लिलावधारकाची विनंती अमान्य केली.

शासनाच्या दि. ७.५.२०१६ च्या आदेशाबाबत लिलावधारक यांनी शासनाकडे पुनर्विलोकन अर्ज दाखल केला. सदर पुनर्विलोकन अर्जावर सुनावणी होऊन मा. मंत्री (महसूल) यांनी दि. २८.३.२०१८ रोजी शासनाचे आदेश क्रमांक गौखनि ३५/०२१६/प्र.क्र. ७८/ख, दिनांक ०७/०५/२०१६, अपर आयुक्त यांचे दिनांक ०५/०७/२०१६ व अपर जिल्हाधिकारी सातारा यांचे दिनांक २२ मे २०१५ चे आदेश रद्द

केले. तसेच अर्जदार यांनी उत्खनन केलेल्या १३३६ ब्रास या परिणामी वजावट करता उर्वरित वाळूसाठ्याची प्रमाणशीर रक्कम व अर्जदार यांची जप्त केलेली अनामत रक्कम ही अर्जदार यांना परत करण्याचे आदेश दिले. त्याअनुषंगाने मौजे तासवडे, ता. कराड, वाळू भूखंड क्र.१ या वाळूगटाकरिता लिलावधारक श्री. संजय जाधव यांना उत्खनन न करता आलेल्या वाळूसाठी प्रमाणशीर रक्कम रु. २,८१,५६,०४४/- + जप्त करण्यात आलेली रक्कम रु. ५३,८९,३५०/- असे एकूण रु. ३,३५,४५,३९४/- एवढ्या रकमेचा परतावा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सबब, लिलावधारक श्री. संजय जाधव यांना रु. ३,३५,४५,३९४/- **(रुपये तीन कोटी पस्तीस लाख पंचेचाळीस हजार तीनशे चौऱ्याण्णव फक्त)** इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. याबाबीवर होणारा खर्च सन २०१८-१९ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, ०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३४३/२०१८/व्यय-९, दिनांक १४/०९/२०१८ अनुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२३१७१२२५७५१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2019.01.23 17:21:35 +05'30'

**(दिनेश चव्हाण)**
अवर सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी सातारा, सातारा.

**प्रत :**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.

३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.

४) जिल्हा कोषागार अधिकारी सातारा, सातारा.

५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.

६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.